महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवरील पोलीस उपनिरीक्षकांच्या ३२३ अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-पोलीस-१११६/प्र.क्र.३४१/पोल-५अ,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२२.

**संदर्भ :-** १) गृह विभाग, शासन निर्णय, समक्रमांक, दि.०१/०९/२०२१.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक (आस्थापना) कार्यालय यांचे पत्र क्र.पोमसं/ ५/१०/पोउपनि-मविस्पप-२०१७/११३/२०१७, दि.१४/०२/२०२२.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय परीक्षा-२०१७ मधून शिफारसपात्र ठरलेले ३२२ व सत्र क्र.११५ मध्ये प्रशिक्षणास मुदतवाढ दिलेला १ उमेदवार असे एकूण ३२३ (३२२+१) उमेदवारांचे पोलीस उपनिरीक्षक पदाचे प्रशिक्षण दि.२१/०६/२०२१ पासून महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे सूरू आहे. संदर्भाधिन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दि.२१/०६/२०२१ ते दि.२०/०३/२०२२ या कालावधीकरीता संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थपानेवर ३२३ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मंजूर दिली असुन त्यानुसार प्रशिक्षण सत्र क्र.११९ मधील प्रशिक्षाणार्थीचे वेतन व भत्ते अदा करण्यात आले आहेत.

सदर ३२३ प्रशिक्षणार्थीचे दि.२१/०६/२०२१ ते दि.२०/०३/२०२२ या कालावधीत पोलीस उपनिरीक्षक पदाचे प्रशिक्षण पूर्ण होणे अपेक्षित होते. परंतु, कोविड-१९ च्या प्रादुर्भावामुळे बरेच प्रशिक्षणार्थी पोलीस उपनिरीक्षक कोविड-१९ ने बाधीत झाल्यामुळे त्यांच्या औषधोपचार व क्वारंटाईन कालावधीमुळे त्यांचे बाह्य वर्गाचे उर्वरित प्रशिक्षण पुर्ण झाले नसून त्यासाठी वाढीव ०४ आठवड्यांचा कालावधी आवश्यक आहे. सदर वाढीव कालावधीत प्रशिक्षण सत्रातील प्रशिक्षणार्थी पोलीस उपनिरीक्षकांचे वेतन व भत्ते अदा करण्याच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथील पोलीस उपनिरीक्षकांच्या ३२३ अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय परीक्षा-२०१७ मधून शिफारसपात्र ठरलेले ३२२ व सत्र क्र.११५ मध्ये प्रशिक्षणास मुदतवाढ दिलेला १ उमेदवार असे एकूण ३२३ (३२२+१) प्रशिक्षणार्थीचे वेतन व भत्ते अदा करण्यासाठी महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या पोलीस उपनिरीक्षकांच्या ३२३ अधिसंख्य पदांना दि.२१/०३/२०२२ ते दि.१७/०४/२०२२ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर अधिसंख्य पदे विविध

पोलीस घटकांमध्ये पोलीस उपनिरीक्षकांच्या रिक्त असलेल्या पदाच्या अधिनतेने निर्माण करण्यात आली असल्याने ही पोलीस उपनिरीक्षकांची रिक्त पदे ज्या आस्थापनेवर आहेत त्या आस्थापनेवर वेतन काढले जाणार नाही याची खात्री करण्यात यावी.

२. या प्रकरणी होणारा खर्च हा वित्तीय वर्ष सन २०२१-२२ व सन २०२२-२३ साठी "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस, १०९ जिल्हा पोलीस दल, (००) (०१) जिल्हा पोलीस बल" या लेखाशिर्षाखाली संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांना मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-६, दि.२०/०२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१११५२६३०९०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAIKWAD GANESH SUDAM

Digitally signed by GAIKWAD GANESH SUDAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=f88a2df366dbf702eda9179bfdd100f151490e691798947c7f6d1b8cf0dab7d6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0585EFA444AE7B29EC4D54E290F9F826C6E4DE96799148FCFC4C6E13F203B34E, cn=GAIKWAD GANESH SUDAM
Date: 2022.03.11 15:28:07 +05'30'

**(गणेश गायकवाड)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
८) पोलीस उपमहानिरीक्षक, विशेष सुरक्षा विभाग, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१०) निवडनस्ती (पोल-५अ)